महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा मुख्य परीक्षा-२०१३ मधील सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदावर न्यायनिर्णयान्वये नियुक्ती देणेबाबत- श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन)

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२०२३/प्र.क्र.१०३/आ(संनि),**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ जून, २०२४

**संदर्भ :** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.३७४(२) दोन (२) (अेइ आर) २०१३/ १४-ब, दि.७.१०.२०१५.
२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक-नियुक्ती-२०१५/(७३/१५)/आ(संनि), दि.१४.१२.२०१५
३) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१.
४) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/बारा, दि.२१.०६.२०२१.
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी २७१५/प्र.क्र.३०२/कार्या-८, दि.२२.०६.२०२१.
६) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ मुंबई यांचे आदेश दिनांक १४.०६.२०२४.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा (मुख्य) परीक्षा - २०१३ अंतर्गत सहायक अभियंता श्रेणी-१, (स्थापत्य) गट-अ (राजपत्रित) या पदावर सरळसेवा भरतीद्वारे घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धात्मक परीक्षेच्या निकालावर आधारित महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांच्या दि.७.१०.२०१५ च्या पत्रान्वये शिफारस प्राप्त झालेल्या १५८ उमेदवारांपैकी नियुक्तीस पात्र ठरलेल्या उमेदवारांना संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य) या गट-अ च्या पदावर नियुक्ती देण्यात आली आहे.

२. उक्त संदर्भ क्र.२ च्या आदेशातील अट क्र.२ अन्वये उमेदवारांना महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक येथे दि.०१.०१.२०१६ रोजी सकाळी १०.३० वा रुजू अहवाल देऊन अधिक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांचेकडून प्रशिक्षणाच्या कार्यक्रमासंबंधी आदेश घेणे अपेक्षित होते. तथापि नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांपैकी श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) या महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक येथे रुजू न होता परस्पर दि.१.२.२०१६ रोजी म्हणजे विहीत मुदतीनंतर अधीक्षक अभियंता, दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस यांच्या अधिपत्याखाली मध्यम प्रकल्प विभाग, आंबडपाल येथे उप कार्यकारी अभियंता या पदी शासन सेवेत रुजू झाल्या. रुजू होण्यापुर्वी त्यांनी विहित मुदतीत रुजू न होण्याबाबत शासनास कोणत्याही प्रकारची

परवानगी मागितली नाही. त्यामुळे शासन निर्णय, जलसंपदा विभाग, दिनांक ११/०८/२०१७ अन्वये श्रीमती वालिया पुनाथील वृंदा वल्सन यांची सहायक अभियंता श्रेणी-१ पदावरील नियुक्ती रद्द करण्यात आली होती.

सदर आदेशास श्रीमती नायर यांनी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र.८१९/२०१७ अन्वये आव्हान दिले. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मूळ अर्ज क्र.८१९/२०१७ मध्ये दि.०१.०८.२०२३ रोजी अंतीम आदेश देताना राज्य सरकारचा दि.११.०८.२०१७ चा आदेश रद्द करून श्रीमती नायर यांना सहा आठवड्यांच्या आत सहाय्यक अभियंता श्रेणी-१, गट-अ या पदावर सेवेत पुनर्स्थापित करण्याचे निर्देश दिले. मा.न्यायाधिकरणाच्या सदर आदेशास रिट याचिका क्र.१३८८३/२०२३ अन्वये मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले. प्रस्तुत याचिकेच्या अनुषंगाने दि.१३.१२.२०२३ रोजी झालेल्या सुनावणीत मा.उच्च न्यायालयाने "Hence, in view of the reasons mentioned as above, we do not find any ground for interference in the order passed by the Tribunal" असे निरीक्षण नोंदविताना खालील प्रमाणे आदेश दिले आहेत.

"As a result, the Writ Petition filed by the State is dismissed. However considering that, while allowing the Original Application and granting relief of reinstatement, the Tribunal has not passed any orders regarding the training required to be undergone by the Applicant and her placement in seniority, we grant liberty to the State to seek clarification from the Tribunal on these two issues, by making appropriate Application."

मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक १३.१२.२०२३ रोजीच्या आदेशाच्या अनुषंगाने मुख्य सादरकर्ता अधिकारी, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दि.३१.०१.२०२४ रोजी दिलेल्या अभिप्रायानुसार मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे संकीर्ण अर्ज क्र.३२०/२०२४ दि.२९.०५.२०२४ रोजी दाखल करण्यात आला.

४. सदर संकीर्ण अर्जावर मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दि.१४.०६.२०२४ रोजी झालेल्या सुनावणीमध्ये पुढीलप्रमाणे आदेश दिले आहेत.

(A) The Applicant shall join training at Maharashtra Engineering Training Academy, Nashik on 24.06.2024 and should join Second Batch for training of Assistant Engineer, Class-I which is started on 01.03.2024.

(B) The 'Seniority in Service' of the Applicant be fixed from the 'Date of Joining' from 01.02.2016.

(C) No order as to costs.

५. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे दि.१४.०६.२०२४ रोजीचे आदेशास अनुसरून श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना जलसंपदा विभागात "सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ" या पदावर सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-२० (रुपये ५६१००-१७७५००) मध्ये दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

**६.** श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम,

२०२१ लागू राहील. याबाबत त्यांच्याकडून प्रशिक्षणाच्या अंतिम टप्प्यात महसुली विभाग वाटप नियमावलीतील तरतूदीनुसार विकल्प घेण्यात येईल व त्यानंतर त्यांना विभागातील सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य) या गट-अ च्या पदावर तात्पुरती पदस्थापना देण्यात येईल.

**७.** श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांची तात्पुरती नियुक्ती ही दोन वर्षाचा परिवीक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील विहित अटी / शर्तींच्या अधीन असेल :-

१) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांची महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा वर्ग-१ जलसंपदा विभागातील नियुक्ती ही अंतिम असून त्यात बदल होणार नाही.

२) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांनी महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक येथे **सोमवार, दि.२४.०६.२०२४ रोजी सकाळी १०.०० वाजता** रुजू अहवाल देऊन अधीक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांचेकडे १ वर्षाच्या (५२ आठवडे) कालावधीकरीता प्रशिक्षणासाठी रुजू होऊन प्रशिक्षण कार्यक्रमासंबंधी आदेश घ्यावेत.

३) सदर उमेदवार दिनांक २४.०६.२०२४ रोजी विहीत मुदतीत हजर न झाल्यास त्यांचे नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील व त्यांचा नियुक्तीकरीता कोणत्याही परिस्थितीत विचार करण्यात येणार नाही. यासाठी त्यांच्याकडून देण्यात येणाऱ्या कोणत्याही कारणांचा/विनंतीचा विचार केला जाणार नाही.

४) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/बारा, दि.२१.०६.२०२१ अन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील तरतूदीनुसार उमेदवारांची ज्येष्ठता निश्चित करण्यात येते. तथापि, श्रीम.नायर (वल्सन) यांची सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या संवर्गातील ज्येष्ठता उपरोक्त न्यायनिर्णयानुसार दि.०१.०२.२०१६ रोजी निश्चित करण्यात येईल. तसेच त्यांना सदर कालावधीतील कोणतीही थकबाकी/आर्थिक लाभ अनुज्ञेय असणार नाही.

५) आवश्यकता असल्यास श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन ४ वर्षापेक्षा कमी नसणाऱ्या कालावधीसाठी भारत सरकार ठरविल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल.

परंतु

(अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षांचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही किंवा,

(ब) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवी २७१५/प्र.क्र.३०२/कार्या.८, दि.२२.०६.२०२१ मधील तरतूदीनुसार श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना परिवीक्षाधीन कालावधीमध्ये कोणतीही वेतनवाढ अनुज्ञेय असणार नाही.

७) श्रीम.नायर (वल्सन) या मराठी व हिंदी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण झाल्या नसतील किंवा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल, तर मराठी व हिंदी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

८) महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती )नियम १९८१ मधील नियम-११ मधील परिशिष्ठ नुसार श्रीम.नायर (वल्सन) नेमणूकीपूर्वी वैद्यकीय मंडळाकडून वैद्यकीय तपासणी करुन घेणे आवश्यक आहे. त्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.वैमंप्र २०२१/प्र.क्र.२३२/आरोग्य-६, दि.२५.११.२०२१ अन्वये पुनर्रचित करण्यात आलेल्या विविध वैद्यकीय मंडळांमार्फत वैद्यकीय तपासणी करण्यात येते. तरी संबंधित वैद्यकीय मंडळामार्फत श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांची वैद्यकीय तपासणी करण्यात यावी व शासनास त्या संबधीचा अहवाल **सहा महिन्याच्या आत** पाठविण्यात यावा.

९) सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०९.०१.२००९ च्या शासन निर्णयामधील निर्देशानुसार संबंधित पोलीस आयुक्त/अधीक्षक यांचेकडून श्रीम.नायर (वल्सन) यांचा चारित्र्य पडताळणी अहवाल पुर्वी दि. २०.०१.२०१६ रोजी प्राप्त झाला आहे. तद्पश्चात त्यांची नियुक्ती रद्द केल्याने प्रलंबित न्यायालयीन प्रकरणामुळे बराच कालावधी लोटल्याने पुन:श्च चारित्र्य पडताळणी अहवाल संबंधित पोलीस आयुक्त/अधीक्षक यांचेकडून प्राप्त होण्याच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

१०) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), शासन पूरकपत्र क्रमांक : मातंसं २०१२/प्र.क्र.२७७/३९, दि.०८.०१.२०१८ मधील तरतूदीनुसार संगणक अर्हतेच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

११) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यां प्रगत व उन्नत गटात समाविष्ट नसल्याचे NCL प्रमाणपत्र / आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक प्रमाणपत्र याबाबतचे सक्षम प्राधिकारी यांनी निर्गमित केलेले NCL प्रमाणपत्र/ आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक प्रमाणपत्र पुन: पडताळणीचा अहवाल संबंधित समितीकडून शासनास प्राप्त होण्याच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

१२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अंनियो १००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१.१०.२००५ मधील तरतूदीनुसार श्रीम.नायर यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल. त्यांना सध्या अस्तित्वात असलेली निवृत्तिवेतन योजना [महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४] आणि सध्या अस्तित्वात असलेली सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरणार नाही.

१३) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना शासन सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास, त्यांनी शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ लेखी सूचना किंवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. यासंदर्भातील राजीनामा स्विकारण्याचे अधिकार केवळ नियुक्ती प्राधिकारी (शासन) यांना असतील. क्षेत्रिय कार्यालयांनी परस्पर प्रशिक्षणार्थ्याचा राजीनामा स्विकृत करु नये किंवा मंजूर करु नये. तथापि, राजीनामा दिल्यानंतर पुन्हा राजीनामा मागे घ्यावयाचा असल्यास, त्यांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अंनियो-२०१९/प्र.क्र.४७०/सेवा-४, दि.०९.०५.२०२२ मधील तरतूदी लागू राहतील.

**मात्र, गैरवर्तणूक, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी सूचना देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.**

१४) महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणासंबंधी, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दिनांक २३.०९.२०११ मधील परिच्छेद-६ (सहा) येथील तरतूदीनुसार प्रशिक्षण सुरु होण्यापूर्वी प्रशिक्षणार्थीने सक्षम प्राधिकाऱ्यास बंधपत्र लिहून द्यावे लागेल. जर श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) ह्या बंधपत्रात नमूद केलेल्या कालावधीत नोकरी सोडत असतील तर बंधपत्रात नमूद केलेली रक्कम प्रशिक्षणार्थीकडून वसूल करुन संबंधित प्राधिकाऱ्याला प्रथम शासनाकडे जमा करावी लागेल. याबाबतचे दर शासन निश्चित करेल. त्यानुसार श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना प्रशिक्षणासाठी रुजू झाल्यानंतर अधीक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांच्याकडे विहित नमुन्यातील बंधपत्र भरुन सादर करणे बंधनकारक राहील व त्याची प्रत शासनास सादर करतील.

१५) प्रशिक्षणादरम्यान प्रशिक्षणार्थींकडून प्रबोधिनीच्या प्रशिक्षणाबाबतच्या नियमांचे व शिस्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. त्यांच्याकडून नियमभंग झाल्यास प्रबोधिनीकडून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल व तसा अहवाल शासनास विनाविलंब पाठविण्यात यावा.

१६) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना प्रशिक्षणाशी संबंधित अनिवार्य बाबी पूर्ण करणे बंधनकारक राहील.

१७) प्रशिक्षणाशी संबंधित शासन निर्णयातील अटी व शर्तींव्यतिरीक्त अन्य बाबी/ अटी-शर्ती ठरविण्याचे अधिकार महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक (मेटा) यांना असतील.

१८) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवी २७१५/प्र.क्र.३०२/कार्या.८, दि.२२.०६.२०२१ नुसार नवीन परिवीक्षा धोरण लागू राहील. ***" सदरहू सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ यांना दोन वर्षाचा परिवीक्षाधीन कालावधी लागू राहील. सदर कालावधीत परिवीक्षा धोरणानुसार शासकीय कामकाज करण्यास सक्षम नसल्याचे सिद्ध झाल्यास संबंधित उमेदवाराची शासकीय सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल."***

१९) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांनी परिवीक्षा कालावधीत विहित १ वर्षाचे (५२ आठवडे) प्रशिक्षण व व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण न केल्यास किंवा त्यांचे काम योग्य अथवा अनुरुप न आढळल्यास त्यांची शासकीय सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

२०) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : परिवी २७१५/प्र.क्र.३०२/८, दिनांक २२.०६.२०२१ मध्ये नमूद केल्यानुसार परिवीक्षा कालावधीत रजेच्या तरतूदी लागू होतील.

२१) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) या पूर्वी शासकीय सेवेत असतील तर त्यांची सरळसेवेने सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या दुसऱ्या परिवीक्षाधीन पदावरील वेतननिश्चिती ही शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दिनांक २३.०३.१९९४ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

जर श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) या पूर्वी शासकीय सेवेत नसतील तर सरळसेवेने सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या परिवीक्षाधीन पदावरील वेतननिश्चिती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

२२) अधीक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांनी प्रशिक्षणार्थींचे कार्यमूल्यमापन अहवाल सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दि.२२.०६.२०२१ मधील तरतूदीनुसार लिहिणे आवश्यक आहे.

२३) श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) सध्या केन्द्र/राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेत कार्यरत असतील तर संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीच्या ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र सादर केल्याशिवाय त्यांना रुजू करुन घेता येणार नाही.

२४) महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक येथे हजर होणाऱ्या उमेदवारांनी आपला रुजू अहवाल अधिक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांचेमार्फत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२११८१२५७२६२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

ANIL VITTHAL DEOKATE

Digitally signed by ANIL VITTHAL DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=0243d4781b79f364761efde22e15161622e87986fb431d9cbc0ecc6469d5e203, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9A8B949B82C94F286DC79EF74BFCAE2A4E204E31853685E98B0B86C438C888E9, cn=ANIL VITTHAL DEOKATE
Date: 2024.06.21 18:29:12 +05'30'

**( अनिल वि. देवकाते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत : बंधपत्र.**

**प्रति,**

श्रीम. वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना ई-मेलद्वारे.

**प्रत :-**

१) अ.मु.स. (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) सचिव, मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,त्रिशुल गोल्ड फ़िल्ड, प्लॉट नं.३४, सरोवर विहार समोर, सेक्टर ११, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई, बेलापूर-४००६१४. (पत्राने)
६) महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
७) महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) महालेखापाल-१/२, लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) उप सचिव (सेवा)/(प्रशासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) अधीक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
१२) अधीक्षक अभियंता, दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस, यांना मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई यांचेमार्फ़त.
१३) कक्ष अधिकारी, कार्यासन आ(वर्ग-१)/आ(वर्ग-२)/आ(प्रशिक्षण)/गोपनीय/नोंदणी शाखा, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४) संग्रहार्थ/कार्यासन आ(संनि).

**(See Govt Resolution GAD No TRN 09/CR 39/09/12 A, dtd 23.9.2011 -Para 6)**

Bond to be executed by the member of the service proceeding on long duration training & foreign training.

KNOW AII MEN by these presents that I .....................................resident of ........................in the District of......................at present employed as................ ......................................in the Department of ....................................Government of Maharashtra do hereby bind myself, my heirs executors and administrators to pay to the Governor of Maharashtra (hereinafter referred to as "the Government") on demand and without demur the sum of Rs................. (Rupees .................................) together with interest thereon from that date of demand at Government rates for the time - being in force on Government loans or if payment is made in a country other than India the equivalent of the said amount in the currency of that country converted at the official rate of exchange between that country and India together with all costs between attorney and client and all charges and expenses that shall or may have been incurred by the Government.

Dated this day of.......................... Two thousand and ..........................

WHEREAS for the better protection of the Government above bounden ................. has agreed to execute this bond with such condition as hereunder is written:

NOW THE CONDITION OF THE ABOVE WRITTEN OBLIGATION is that in the event of the above bounden.............................. resigning or retiring from service without returning to duty after expiry or termination of the period of training or at any time within a period of three years after his return to duty, he shall forthwith pay to the Government or as may be directed by the Government on demand the said sum of Rs.............(Rupees..................................) together with intrest thereon from the date of demand at Government rates for the timebeing in force on Government loans.

And upon the above bounden.....................making such payment the above written obligation shall be void and of no effect otherwise it shall be and remain in full force and virtue.

Stamp duty payable on this bond shall be borne and paid by the Government.

Signed and delivered by the above bounden................. ........in the presence of ............................

Signature

Accepted for and on behalf of

Governor of Maharashtra

Officers Signature and Designation

E:STP points---letters & G. R'S 21